



# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक-२२७९३३४४ Email ID : desk14.gad-mh@gov.in

..............................................................................................................................

क्र. : प्रतिनि ११२४/प्र.क्र.४७/प्रशा-१. दि. १३.०३.२०२५

प्रति,

सह सचिव /उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय : राज्य माहिती आयोगाच्या कोकण खंडपीठ, नागपूर खंडपीठ व छत्रपती संभाजी नगर खंडपीठ या कार्यालयांतील 'उप सचिव' हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.**

**संदर्भ :** १.सा.प्र.वि.शा.नि.क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दि.१७.१२.२०१६.
२. सा.प्र.वि.शा.नि.क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दि.१६.०२.२०१८.
३.सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या.१४, दि.३१.०८.२०१७.

महोदय /महोदया,

संदर्भ क्र.१ येथील दि.१७.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भ क्र.२ येथील दि.१६.०२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर धोरणामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.३ दि.३१.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी /कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे.

२. उपरोक्त विषयास अनुसरून, 'राज्य माहिती आयोगाच्या' खालील नमूद कार्यालयांतील पदे **मंत्रालयीन उप सचिव संवर्गातून** प्रतिनियुक्तीने भरावयाची आहेत.

| **अ.क्र.** | **प्रतिनियुक्तीचे पद व कार्यालय** | **प्रतिनियुक्तीने भरावयाच्या पदांची संख्या** |
|---|---|---|
| १ | उप सचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ कोकण. | १ |
| २ | उप सचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर. | १ |
| ३ | उप सचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजी नगर. | १ |

३. या अनुषंगाने आपल्या विभागातील सर्व उप सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांना याबाबत अवगत करावे. सदर पदावरील प्रतिनियुक्तीसाठी इच्छुक उप सचिवांचे, मागील ५ वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह वैयक्तिक माहिती, संपूर्ण सेवा तपशील, ना-विभागीय चौकशी प्रमाणपत्र, विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इ. माहिती सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये नमूद केल्यानुसार या विभागाकडे **दि.२८.०३.२०२५ पर्यंत** निश्चितपणे प्राप्त होईल अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच सदर प्रतिनियुक्तीस कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास निरंक असेही या विभागास कळविण्यात यावे, ही विनंती.

४. उपरोक्त पदासाठी प्रतिनियुक्तीवर जाण्यास इच्छुक असलेल्या अधिकाऱ्यांनी परस्पर या विभागाकडे अर्ज करू नयेत. त्यांनी आपआपल्या विभागास अर्ज सादर करावेत. परस्पर अर्ज सादर केल्यास त्या अर्जाचा विचार करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितास काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

५. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२५०३१३१७०१४०२८०७ हा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

आपला,

सोबत: विवरणपत्र.

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.03.13 17:02:35 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत : निवडनस्ती सा.प्र.वि./प्रशा-१.

## विवरणपत्र

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय |
|---|---|---|
| १ | अधिकाऱ्यांचे संपूर्ण नाव | |
| २ | जन्मदिनांक | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | |
| ४ | स्थायित्व प्रमाणपत्र प्राप्त आहे किंवा कसे | |
| ५ | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या (साक्षांकित प्रतीसह) छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| ७ | चालू वर्षातील दि.३१ मार्च अखेरचे मत्ता व दायित्वे सादर केले आहे का? | |
| ८ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | |
| १० | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | |
| ११ | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| १२ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे. | |